राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (NMSA) अंतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाच्या सन २०२०-२१ मध्ये सुधारित वार्षिक कृती आराखडयास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राशेअ-४४२०/प्र.क्र. ६६ /८-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: २३ ऑक्टोबर, २०२०

संदर्भ:-

१. केंद्र शासनाने www.agricoops.nic.inया सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सुचना.
२. केंद्र शासनाचे पत्र क्र. १-१/२०२०-RFS-III (८२६३२), दिनांक १२.०५.२०२०
३. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआआ-२०२०/कोक्षेवि/वाकृअ/प्र.क्र.१०/R-३३/रासक, दि.१९.०६.२०२०
४. वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२०/प्र.क्र. ६५/अर्थ-३, दिनांक ४.५.२०२०
५. कृषि विभागाचा शासन निर्णय क्रमांक राशेअ ४४२०/प्र.क्र. ६६/८-अे, दिनांक २५.६.२०२०
६. केंद्र शासनाचे पत्र क्र.२-३/२०१७-RFS-III, दिनांक १६ एप्रिल, २०२०
७. केंद्र शासनाचे पत्र क्र.१-३/२०२०-RFS-III (८४३००), दिनांक १५ जून, २०२०
८. केंद्र शासनाचे पत्र क्र. १-२१/२०१८-RFS-III (pt), दिनांक ११.९.२०२० (३ पत्रे)
९. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआआ-२०२०/कोक्षेवि/वाकृअ/प्र.क्र.५/आर-५६/रासक, दि.१.१०.२०२०
१०. कृषी विभागाचे पत्र क्र. संकिर्ण २०२०/प्र.क्र. ५८/२-अे, दिनांक १२ ऑक्टोबर, २०२०

**प्रस्तावना**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास [Rainfed Area Development (RAD)] योजनेची अंमलबजावणी करण्यात येत असून त्याकरिता केंद्र व राज्य हिश्श्याचे अनुदानाचे प्रमाण ६०:४० असे आहे.

केंद्र शासनाने संदर्भ क्र. २ येथील दिनांक १२.५.२०२० रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमांची अंमलबजावणीसाठी सन २०२०-२१ करिता महाराष्ट्र राज्याकरिता कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमासाठी केंद्र हिश्श्यापोटी रु.१९००.०० लाख व त्यासाठीचा पूरक राज्य हिस्सा रु.१२६६.६७ लाख याप्रमाणे एकूण रु.३१६६.६७ लाख इतक्या वार्षिक कृती आराखडयास मान्यता दिली आहे. सदर कार्यक्रमासाठी राज्य शासनाने सन २०२०-२१ च्या श्वेतपुस्तिकेनुसार रु. ४५६१.५५ लाख इतका निधी अर्थसंकल्पित केला आहे.

कोविड-१९ च्या पार्श्वभूमिवर वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ४ येथील दि.४.५.२०२० च्या शासन निर्णयानुसार सन २०२०-२१ करिता राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमासाठी अर्थसंकल्पित निधीच्या ३३ टक्केच्या मर्यादेत रु. १५०५.३१ लाख इतक्या वार्षिक कृती आराखड्यास संदर्भाधीन क्र. ५ येथील शासन निर्णयानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे.

केंद्र शासनाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास [Rainfed Area Development (RAD)] योजनेचा सन २०१९-२० या वर्षातील केंद्र हिश्श्यापोटी रु. १०९४.४२ इतका निधी सन

२०२०-२१ या वर्षात खर्च करण्यासाठी संदर्भ क्र. ७ येथील पत्रान्वये पुनर्जिवित करुन दिलेला आहे. त्याचप्रमाणे कृषि विभागाच्या संदर्भाकित क्र. ८ येथील पत्रान्वये सन २०२०-२१ या वर्षाचा पहील्या हप्त्यासाठी केंद्र हिश्श्याचा रु. ४७५.०० लाख इतका निधी उपलब्ध करुन दिला आहे. आता वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार केंद्र सहाय्यित योजनाकरिता मागील आर्थिक वर्षाचा अखचित निधी (केंद्र हिस्सा+राज्य हिस्सा) व चालू आर्थिक वर्षामध्ये पहिल्या हप्त्यात प्राप्त निधी (केंद्र हिस्सा+राज्य हिस्सा) मिळून एकूण उपलब्ध असलेल्या निधीच्या मर्यादेत सुधारित प्रशायकीय मान्यतेचे आदेश निर्गमित करण्याबाबत संदर्भाधीन क्र. १० येथील विभागाच्या दिनांक १२ ऑक्टोबर, २०२० च्या पत्रान्वये कळविले आहे. त्याअनुषंगाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमासाठी संदर्भाकित क्र. ५ येथील दिनांक २५.६.२०२० रोजीचा प्रशासकीय मान्यतेचा शासन निर्णय अधिक्रमित करुन पुनर्जिवित निधी रु. १८२३.८५ (केंद्र हिस्सा रु. १०९४.४२ लाख व राज्य हिस्सा रु. ७२९.४३ लाख) व पहिल्या हप्त्याचा निधी रु. ७९१.६७ लाख (केंद्र हिस्सा रु. ४७५.०० लाख व राज्य हिस्सा रु.३१६.६७ लाख) एकूण रु.२६१५.५२ लाख निधीच्या वार्षिक कृती आराखड्यास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (NMSA) अंतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाच्या सन २०२०-२१ मध्ये दिलेल्या प्रशासकीय मान्यतेचा दिनांक २५.६.२०२० चा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून या कार्यक्रमाकरिता सन २०२०-२१ साठी रु.२६१५.५२ लाख (रुपये सव्वीस कोटी पंधरा लाख बावन्न हजार फक्त) वार्षिक कृती आराखडयास (केंद्र हिस्सा १५६९.४२ +राज्य हिस्सा १०४६.१० ) पुढीलप्रमाणे सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**रक्कम लाखात**

| प्रवर्ग | केंद्र | राज्य | एकूण |
|---|---|---|---|
| **सर्वसाधारण** | **११९१.०९** | **७९५.६०** | **१९८६.६९** |
| **अनुसूचित जमाती** | **२००.५८** | **१३१.४९** | **३३२.०७** |
| **अनुसूचित जाती** | **१७७.७५** | **११९.०१** | **२९६.७६** |
| **एकूण** | **१५६९.४२** | **१०४६.१०** | **२६१५.५२** |

२) सन २०२०-२१ या वर्षाच्या मंजूर तरतूदीपैकी उपलब्ध होणाऱ्या निधी मधूनच सन २०१९-२० या वर्षातील अखर्चित असलेला व चालू वर्षात खर्च करण्यासाठी पुनर्जिवित करुन दिलेला निधी देखिल उपलब्ध करुन देण्यात यावा.

३) चालू वर्षी या योजनेंतर्गत निधी उपलब्धता करुन दिल्यानंतर तो प्रथमत: सन २०१९-२० या वर्षातील प्रलंबित प्रकरणांसाठी वापरण्यात यावा व प्रलंबित प्रकरणे निकाली निघाल्यानंतर निधी शिल्लक राहिल्यास शेतकऱ्यांकडून नवीन अर्ज स्विकारण्यासाठीचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी स्वतंत्रपणे सादर करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२६१६४८२४०५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Bharati Dinesh Dhuri

Digitally signed by Bharati Dinesh Dhuri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ac65e55bc2f86ec37c6f25108b6605bc20e71b4742dd20d7e8f5e14cda6a2a7f, serialNumber=6b3c122edc26ac3532130d69cd06c9664e8a139b9a532752e240a4851a8c9d3c, cn=Bharati Dinesh Dhuri
Date: 2020.10.26 16:52:34 +05'30'

**( भारती दि. धुरी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ, अंधेरी,मुंबई.
४. जिल्हाधिकारी (सर्व)
५. मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व जिल्हा परिषदा)
६. मुख्य कार्यकारी अधिकारी,वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा,पुणे
७. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
८. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०. व्यवस्थापकीय संचालक, जिल्हा अग्रणी बँक (बँक ऑफ महाराष्ट्र, लोकमंगल ,पुणे)
११. सर्व कृषि विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषि अधिकारी/सर्व तालुका कृषि अधिकारी/ सर्व मंडळ कृषि अधिकारी
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
१४. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१५. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
१६. सहायक संचालक(लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१७. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी
१८. उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/ नाशिक/ पुणे/औरंगाबाद/ अमरावती/नागपुर
१९. उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
२०. सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
२१. वित्त विभाग (का. व्यय-१/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय,मुंबई
**२२.** निवडनस्ती ८-अे